**राष्ट्रध्वजाच्या उचित सन्मानाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः रिट याचिका-०११२/२८७/प्र.क्र.७८/विशा १ अ**

२ रा मजला, मंत्रालय, मुंबई.

दिनांक : २२ एप्रिल, २०१५

वाचा -

1) **शासन परिपत्रक क्रमांक रिट याचिका -०११२/२८७/प्र.क्र.७८/विशा१अ, दि. १.१.२०१५**
2) **जनहित याचिका क्र.१०३/२०११ बाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. ३०.३.२०१५ च्या सुनावणीत दिलेले निदेश.**

परिपत्रक -

दरवर्षी २६ जानेवारी, १५ ऑगस्ट, १ मे, इतर राष्ट्रीय कार्यक्रम, महत्वाचे सांस्कृतिक कार्यक्रम व क्रिडा सामन्यांच्या वेळी विद्यार्थी व नागरिकांकडून कागदाच्या व प्लास्टीकच्या राष्ट्रध्वजांचा वापर करण्यात येतो. सदर कार्यक्रम पार पडल्यानंतर फाटलेले कागदी राष्ट्रध्वज तसेच प्लास्टिकचे राष्ट्रध्वज मैदानात, रस्त्यावर तसेच कार्यक्रमाच्या ठिकाणी इतस्तत: पडलेले असतात. असे राष्ट्रध्वज पायदळी तुडविले जातात. त्यामुळे राष्ट्रध्वजाचा अवमान होतो. सबब, मा. न्यायालयाने दि. ३०.३.२०१५ रोजी दिलेले निदेश आणि ध्वजसंहिता, २००२ व राष्ट्रीय अवमान कायदा, १९७१ च्या अधीन राहून खालील उपाययोजना कराव्यात.

१. जिल्हाधिकाऱ्यांनी तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांनी राष्ट्रध्वज सन्मानपूर्वक हाताळण्यासाठी प्रजासत्ताक दिन, स्वातंत्र्य दिन अशा विशेष प्रसंगी नागरिकांसाठी जनजागृती कार्यक्रम आयोजित करावेत. तसेच राष्ट्रध्वजाचा उचित सन्मान राखण्यासाठी ध्वजसंहिता, २००२ व राष्ट्रीय अवमान कायदा, १९७१ मध्ये नमुद केलेल्या कायदेशीर तरतुदींबाबत व्यापक प्रमाणात जनजागृती करावी.
२. खेळांचे सामने आयोजित केले जातात अशा स्टेडियमच्या ठिकाणी स्थानिक प्रशासन, स्टेडियमचे प्रशासन व आयोजक यांनी राष्ट्रध्वजाचा उचित सन्मान राखण्यासाठी विशेषत्वाने काळजी घ्यावी व उचित उपाययोजना कराव्यात.
३. राष्ट्रध्वजाचा उचित सन्मान राखला जातो अथवा नाही, याबाबत जिल्हा प्रशासन स्तरावर जिल्हाधिकारी, महानगरपालिका आयुक्त आणि इतर स्थानिक स्वराज्य संस्था यांनी प्रजासत्ताक दिन, महाराष्ट्र दिन व स्वातंत्र्य दिन या दिनांच्या आणि अशा प्रकारच्या इतर वेळी विशेष अधिकारी नेमावेत व त्यांच्यावर जबाबदारी सोपवावी. राज्यशासनामार्फत अशा

दिवसांपूर्वीच सूचना दिल्या जातील. जिल्हाधिकारी, इतर स्थानिक प्रशासन व जबाबदार प्राधिकाऱ्यांनी या दिवसांपूर्वीच राष्ट्रध्वजाच्या उचित सन्मानाबाबत उपाययोजना व जनजागृती करावी.

४. प्लास्टिकच्या राष्ट्रध्वजांच्या वापरास संपूर्ण प्रतिबंध असून, सार्वजनिक ठिकाणी पडलेले राष्ट्रध्वज अशासकीय संस्थांच्या मदतीने गोळा करण्यात यावेत. अशा प्रकारे गोळा केलेले राष्ट्रध्वज ध्वजसंहितेमध्ये नमुद केलेल्या कार्यपध्दतीनुसार नष्ट करण्याबाबतची कार्यवाही करावी.

५. इतस्तत: पडलेले राष्ट्रध्वज गोळा करुन ते सन्मानपूर्वक नष्ट करण्यासाठी कायद्यातील तरतुदींच्या अधिन राहून उचित उपाययोजना संबंधित पोलीस ठाण्याच्या अधिकाऱ्यांनी कराव्यात. राष्ट्रीय अवमान अधिनियमातील तरतुदींची काटेकोर अंमलबजावणी होण्यासाठी उचित कार्यवाही करावी. राष्ट्रध्वजाचा अवमान करणाऱ्या तत्त्वांविरुध्द कायदेशीर कारवाई करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०४२२१५५५४८८८२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.22 16:32:33 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व).
४. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व).
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सर्व सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय.
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१२. विभागीय आयुक्त (सर्व).
१३. जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी ( सर्व ).
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).
१५. पोलीस आयुक्त ( सर्व ).
१६. परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक ( सर्व ).
१७. जिल्हा पोलीस अधीक्षक (सर्व).
१८. संचालक, क्रिडा व युवक संचालनालय.
१९. जिल्हा माहिती अधिकारी (सर्व).
२०. जिल्हा क्रिडा अधिकारी ( सर्व ).
१९. प्रबंधक, मूळ शाखा उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने ).
२०. प्रबंधक अपील शाखा उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने ).
२१. मुख्याधिकारी, नगरपरिषद ( सर्व ).
२२. निवड नस्ती, कार्यासन विशा-१अ, गृह विभाग.